शासकीय कर्मचाऱ्यांच्या संपकाळात
तात्पुरती नियुक्ती केलेल्या कर्मचाऱ्यांना
वर्ग ३ व वर्ग ४ च्या सेवामध्ये प्राधान्यक्रम-
प्रतिक्षायादीवरील नावासंबंधी.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : एसटीके-१०८४/३००/कें.नं.४९/१६-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १ जून १९८४.

वाचा :- शासन निर्णय, क्रमांक : एसटीके-१०७८/७१८/४११/१६-अ, दिनांक ११/५/१९७८ व क्रमांक : एसटीके-१०८३/सीआर-३८/१६-अ, दिनांक २९/९/८३.

शासन निर्णय :-

शासन निर्णय, क्रमांक एसटीके-१०७८/७१८/४११/१६-अ, दिनांक ११/५/१९७८ अन्वये संपकालीन कर्मचाऱ्यांची यादी जिल्हाधिकाऱ्यांनी तयार करून सेवा भरती अधिकाऱ्यांकडून मागणी आल्यावर त्या यादीवरील पात्र उमेदवारांना निवडीसाठी पाठवावयाचे आदेश आहेत. जिल्हाधिकाऱ्यांकडे असलेल्या प्रतिक्षा यादीवरील ज्या संपकालीन कर्मचाऱ्यांना तात्पुरत्या पर्यायी नोकऱ्या देण्यात आलेल्या आहेत त्यांची नावे जिल्हाधिकारी यांच्याकडे असलेल्या प्रतिक्षा यादीवर किती काळापर्यंत ठेवण्यात यावी हा प्रश्न शासनाचे विचाराधीन होता. याबाबत आता असे आदेश देण्यात येतात की, जिल्हाधिकारी यांचेकडे असलेल्या प्रतिक्षा यादीवरील ज्या संपकालीन कर्मचाऱ्यांना तात्पुरती पर्यायी नोकरी देण्यात आली आहे अशांची नावे त्यांना नियमित दीर्घ मुदतीची नोकरी मिळेपर्यन्त अथवा ते त्यांचेसाठी शिथिल केलेल्या विहित वयोमर्यादेत असेपर्यन्त, यापैकी जे आधी घडेल तोपर्यन्तच, प्रतिक्षा यादीवर ठेवण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

मुकुन्द स. सोकाशी

( मुकुन्द स. सोकाशी )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी.